**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत राबविण्यात येणा-या वैयक्तिक लाभाच्या योजनेंतर्गत शालांत परिक्षोत्तर (पोस्ट मॅट्रिक) शिक्षण घेणाऱ्या अपंग विद्यार्थी लाभार्थ्यांना त्यांच्या आधार क्रमांक संलग्नीत बँक खात्यात रक्कम थेट जमा करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**
**शासन निर्णय क्र. अपंग -२०१८/प्र.क्र.१७९/अ.क.२,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु मार्ग, मंत्रालय, मुंबई - ३२
दिनांक :- ०२/०८/२०१८

**वाचा :-**

१) महाराष्ट्र आधार (वित्तीय व इतर अर्थसहाय्य, लाभ व सेवा यांचे लक्ष्यित वितरण) अधि.२०१६.
२) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन अधिसूचना, क्रमांक इबीसी - २०१७/प्र.क्र.१२१/ शिक्षण - १, दिनांक २५ मे, २०१७.
३) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय, क्रमांक इडीडी-२००३/ प्र.क्र.७१/ सुधार-२, दिनांक १५.११.२००३.
४) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय, क्रमांक इडीडी-२०१३/ प्र.क्र.९१/ अ.क्र.२, दिनांक ३०.०८.२०१४.
५) उच्च व तंत्र शिक्षण विभाग, शासन निर्णय, क्र. टीईएम - २०१६/प्र.क्र.५५९/तांशि-४, दिनांक १५.०४.२०१७.
६) सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, शासन निर्णय, क्रमांक इबीसी-२०१७/प्र.क्र.४०३/ शिक्षण-१, दिनांक ०७.०८.२०१७

**प्रस्तावना :-**

राज्य शासनाच्या वैयक्तिक लाभाच्या योजनांमध्ये थेट लाभ हस्तांतरण (DBT) प्रक्रिया राबविण्यात येत असुन, या अंतर्गत आधार क्रमांकाचा व्यापक प्रमाणावर वापर करण्यासंदर्भात शासनाचे धोरण आहे. सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत राबविण्यात येणा-या विविध शैक्षणिक योजना तसेच वैयक्तिक लाभाच्या योजनांची अधिक चांगल्या व पारदर्शक पध्दतीने अमंलबजावणी करण्याकरिता व योग्य आणि पात्र लाभार्थ्यांना अचूक लाभ देण्यासाठी लाभार्थ्यांच्या आधार क्रमांकाची व त्याच्या बँक खात्यासंबंधी नोंद असणे आवश्यक आहे.

सध्या महाराष्ट्र आधार (वित्तीय व इतर अर्थ सहाय्य, लाभ आणि सेवा यांचे लक्ष्यित वितरण) अधिनियम, २०१६ अंतर्गत शासनाकडून देण्यात येणारे कोणतेही अर्थसहाय्य, वित्तीय लाभ व सेवाच्या प्रयोजनार्थ संबंधित लाभार्थ्यांचे अधिप्रमाणन करुन किंवा पुरावा म्हणून आधार क्रमांक प्राप्त करुन त्या आधारे लाभार्थ्यांस थेट त्यांच्या आधारसंलग्नीत बँक खात्यात लाभाची रक्कम जमा करणे आवश्यक आहे. त्यानुसार सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागामार्फत अपंग विद्यार्थी लाभार्थ्यांकरिता राबविण्यात येणा-या संदर्भ क्र. २ येथील दिनांक २५ मे, २०१७ च्या अधिसूचने अन्वये अधिसूचित केलेल्या विविध शैक्षणिक व वैयक्तिक लाभाच्या योजनेतंर्गत लाभार्थ्यांना अर्थसहाय्य, वित्तीय लाभ किंवा सेवा मिळविण्यासाठीची रक्कम ही थेट लाभार्थ्यास त्याच्या आधार संलग्नीतबँक खात्यात जमा करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय** :-

शालांत परिक्षोत्तर (पोस्ट मॅट्रिक) शिक्षण घेणाऱ्या अपंग विदयार्थी लाभार्थ्यांना त्यांच्या आधार क्रमांक सलग्नीत बँक खात्यात थेट रक्कम अदा करणेबाबत शासन पुढील प्रमाणे धोरण निश्चित करीत आहे.

**१.** महाराष्ट्र आधार (वित्तीय व इतर अर्थ सहाय्य, लाभ आणि सेवा यांचे लक्ष्यित वितरण) अधिनियम, २०१६ मधील तरतूदी व संदर्भाधिन क्र. २ येथील अधिसूचनेच्या अधिनतेने सन २०१७-१८ या वर्षापासून सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागाच्या अधिपत्याखाली परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या योजनेतील शालांत

परिक्षोत्तर (पोस्ट मॅट्रिक) अपंग विद्यार्थी लाभार्थ्यांना अर्थसहाय्य, वित्तीय लाभ किंवा सेवा मिळविण्यासाठीची अट म्हणून एखाद्या व्यक्तीची ओळख सिध्द करण्याच्या प्रयोजनार्थ, अशा व्यक्तीचे अधिप्रमाणन करणे किंवा आधार क्रमांक असल्याचा पुरावा सादर करणे आवश्यक राहील. त्यानुसार योजनांतर्गत देय वित्तीय लाभाची रक्कम ही लाभार्थ्यांच्या आधार संलग्नीत बँक खात्यात थेट जमा करण्यात यावी.

२. सदर प्रयोजनार्थ माहिती व तंत्रज्ञान संचालनालयाकडून केंद्रीभूत थेट लाभ हस्तांतरण प्रणाली (State DBT and Service Portal) : http://mahadbt.gov.in हे संकेतस्थळ विकसित करण्यात आले असून, या संदर्भातील मार्गदर्शक सुचना वेळोवेळी स्वतंत्रपणे निर्गमित करण्याची कार्यवाही करण्यात येईल. सदर State DBT and Service Portal प्रणालीमार्फत प्रथम टप्प्यात सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या योजनेतील अपंग विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परीक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनांतर्गत लाभ मिळण्याकरिता अर्ज करण्यापासून ते रक्कम लाभार्थ्यांच्या बँक खात्यात जमा करण्यापर्यंतच्या सर्व प्रक्रिया राज्यस्तरीय DBT पोर्टलमार्फत करणे अनिवार्य राहील.

३. प्रस्तुत प्रकरणी संदर्भाधिन क्र. ५ येथील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दिनांक १५.०४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयातील तरतूदीनुसार परिशिष्ट- अ मध्ये नमूद केलेल्या योजनेतील अपंग विद्यार्थ्यांच्या अनुज्ञेय शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी शुल्काची प्रतिपूर्ती ही संबंधित विद्यापीठ / शैक्षणिक संस्था / महाविद्यालये/ तंत्रनिकेतने यांना करण्याऐवजी शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक लाभाची रक्कम थेट संबंधित विद्यार्थ्याच्या आधार संलग्नीत बँक खात्यात जमा करण्यात यावी.

४. उपरोक्त शिष्यवृत्ती , शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने योजनांचा लाभ अपंग विद्यार्थ्यांना देण्यासाठी संदर्भाधिन ५ येथील उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या दि. १५.०४.२०१७ रोजीच्या शासन निर्णयान्वये निश्चित केल्यानुसार आधार संलग्नीत बायोमेट्रीक उपस्थिती प्रणाली स्थापित करणे संबंधित विद्यापीठ/ शैक्षणिक संस्था/ महाविद्यालये/ तंत्रनिकेतने यांना बंधनकारक असेल. अशा प्रणालीवर सर्व विद्यार्थ्यांची दैनंदिन उपस्थिती नोंदविणे आवश्यक राहील व उच्च व तंत्रशिक्षण विभागाने निश्चित केल्यानुसार किमान उपस्थिती असलेल्या विद्यार्थ्यांना सदर योजनांचा लाभ देय राहील.

४.१ याप्रमाणे अपंग विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने निर्वाह भत्ता, विद्यावेतने योजनेअंतर्गत संबंधित शैक्षणिक वर्षाकरिता मंजूर करण्यात येणारी शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतनेची रक्कम ही दोन हप्त्यामध्ये पात्र लाभार्थी विद्यार्थ्यांस मंजूर करण्यात येईल. त्यापैकी सक्षम प्राधिका-याकडून पहिला हप्ता हा संबंधित शैक्षणिक वर्षातील ३१ ऑगस्टपर्यंत व उर्वरित दुसरा हप्ता ३१ जानेवारीपर्यंत लाभार्थ्यांच्या आधार संलग्नीत बँक खात्यात जमा करण्यात येईल व त्याची सुचना DBT पोर्टलद्वारे महाविद्यालयास दिली जाईल. त्यामुळे उपरोक्त मुदतीपूर्वी संबंधित विद्यापीठ/ शैक्षणिक संस्था/ महाविद्यालय/तंत्रनिकेतने यांनी कोणत्याही अपंग विद्यार्थ्यांकडून शैक्षणिक प्रवेशाच्यावेळी शिक्षण शुल्काची रक्कम घेऊ नये. तसेच कोणत्याही अपंग विद्यार्थ्यांची आर्थिक पिळवणूक होणार नाही, याची योग्य ती दक्षता घेण्याची जबाबदारी संबंधित शैक्षणिक संस्थेची असेल. सदर सुचनांचे उल्लंघन झाल्याचे आढळून आल्यास संबंधिताविरुध्द नियमानुसार प्रशासकीय वा शिस्तभंग विषयक कारवाई करण्यात येईल.

४.२ अपंग पात्र लाभार्थी विद्यार्थ्यास वरीलप्रमाणे DBT द्वारे पहिल्या हप्त्यात मंजूर रक्कमेच्या ५० % पर्यंत रक्कम प्राप्त होईल. त्यापैकी शिक्षण शुल्कापोटीची मंजूर रक्कम ही संबंधित विद्यार्थ्याने त्याच्या विद्यापीठ/ शैक्षणिक संस्था/ महाविद्यालय/तंत्रनिकेतनास तात्काळ अदा करावी. याबाबतची सर्वस्वी जबाबदारी ही संबंधित विद्यार्थ्यांची असेल.

४.३ पात्र अपंग विद्यार्थ्यांस मंजूर रक्कमेच्या उर्वरित दुस-या हप्त्याची ५० % रक्कम अदा करण्याबाबत आणि विद्यार्थ्यांची परीपूर्ण माहिती (data base) ही प्रस्तावित थेट लाभ हस्तांतरण (DBT) पोर्टलशी जोडण्यासाठी

उपलब्ध करुन देण्याबाबत उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या संदर्भाधिन क्र. ५ येथील शासन निर्णयामधील तरतूदीनुसार कार्यवाही करण्यात यावी.

५. शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनांकरिता पात्र अपंग विद्यार्थी लाभार्थ्यांना अदा करण्यात येणा-या लाभाच्या रक्कमेच्या वितरण पध्दती संदर्भातील उपरोक्त बदल वगळता विषयांकित योजनांच्या प्रचलित संदर्भाधीन क्र.३, ४ व ६ येथील शासन निर्णयातील अटी व शर्ती तसेच निर्धारित केलेली अंमलबजावणीची उर्वरित सर्व कार्यपध्दती कायम राहील.

६. वरील योजनांतर्गत आधार क्रमांक संलग्नित बँक खात्यावर लाभ देण्याबाबतची कार्यवाही करताना लाभार्थ्यांच्या आधार क्रमांक, बँक खाते क्रमांक व त्याच्याशी संबंधित कोणतीही वैयक्तीक स्वरुपाची माहिती जाहीरपणे प्रकाशित करु नये, किंवा अशी माहिती ऑनलाईन प्रणालीद्वारे सहजरित्या उपलब्ध होणार नाही, याची खबरदारी घेण्यात यावी. लाभार्थ्यांना लाभ देण्यापुरताच अशा माहितीचा वापर करण्यात यावी, आणि याविषयी केंद्रीय आधार कायदा, २०१६ तसेच माहिती तंत्रज्ञान कायदा, २००० व त्याखालील नियम २०११ मधील तरतुदीचे पालन करुन कार्यवाही करण्यात यावी.

७. प्रस्तुत शासन निर्णयाच्या सोबतच्या परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या योजनेतील अपंग विद्यार्थ्याकरिता शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनांच्या प्रभावी अमंलबजावणीसाठी **आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, पुणे** यांना "**समन्वय अधिकारी**" तसेच "**आहरण व संवितरण अधिकारी**" म्हणून घोषित करण्यात येत आहे.

८. शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनेतंर्गत देण्यात येणा-या लाभाची रक्कम अपंग विद्यार्थ्यांच्या आधार संलग्नित बँक खात्यात जमा करण्यासाठी पुढीलप्रमाणे कार्यपध्दती विहीत करण्यात येत आहे.

(अ) परिशिष्ट-अ मध्ये नमूद केलेल्या योजनेतील पात्र अपंग विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनेच्या लाभासाठी शासनाने वेळोवेळी निश्चित केलेली कार्यपध्दती, अटी, शर्ती व निकष लागू राहतील.

(ब) अर्जदार अपंग विद्यार्थ्यानी शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनेसंदर्भातील ऑनलाईन अर्जासोबत त्यांच्या आधार क्रमांकाबरोबरच आधार संलग्नित बचत बँक खात्याचा तपशिल द्यावा.

(क) संबंधित विद्यापीठ/ शैक्षणिक संस्था/ महाविद्यालये/ तंत्रनिकेतने सक्षम प्राधिकारी यांनी सदर योजने संबधीच्या शासन निर्णयान्वये वेळोवेळी विहीत केलेल्या कार्यपध्दतीनुसार प्राप्त अर्जांची छाननी करावी व डीबीटी पोर्टलवर दर्शविल्याप्रमाणे कार्यवाही करावी.

(ड) संबंधित विद्यापीठ/ शैक्षणिक संस्था/ महाविद्यालये/ तंत्रनिकेतने सक्षम प्राधिकारी यांनी अपंग विद्यार्थ्यांचा प्रवेश निश्चित करतांना त्यांचा आधार क्रमांकाशी (Unique Number) (AISHE Code) अथवा विद्यापीठ/ शैक्षणिक संस्था/ महाविद्यालये/ तंत्रनिकेतनेने दिलेला नोंदणीकृत क्रमांक जोडून त्याआधारे विकसित केलेली विद्यार्थ्यांची परिपूर्ण माहिती (Data Base) ही प्रस्तावित DBT पोर्टलशी जोडण्यासाठी त्या-त्या योजनेशी संबंधित जिल्हास्तरावरील सामाजिक न्याय विभागाच्या अधिका-यांना उपलब्ध करुन दयावी.

(ई) आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, पुणे यांनी प्रत्येक योजनेकरिता राष्ट्रीयकृत बँकेत एक स्वतंत्र खाते उघडून त्याद्वारे अपंग विद्यार्थ्यांना शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक लाभ राज्यस्तरीय DBT पोर्टल मार्फत अदा करण्याची कार्यवाही करावी. सदरील बँक खात्या व्यक्तिरिक्त इतर कोणतेही खाते जिल्हा/ तालुका/ विभागस्तरावर ठेवण्यात येऊ नये.

(फ) आयुक्त, अपंग कल्याण आयुक्तालय, पुणे यांनी अपंग विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनेची माहिती महाविद्यालयाच्या सांकेतिक

क्रमांकासह (Unique Number) विद्यापीठ/ शैक्षणिक संस्था/ महाविद्यालये/ तंत्रनिकेतनेने दिलेला नोंदणीकृत क्रमांक (AISHE) DBT पोर्टलला जोडण्याची कार्यवाही करावी.

(ग) सदर प्रयोजनार्थ माहिती तंत्रज्ञान संचालनालयाकडून केंद्रीभूत थेट लाभ हस्तातंरण पोर्टल विकसित करण्यात आले असून, यासंदर्भात वेळोवेळी मार्गदर्शक सूचना स्वतंत्रपणे निर्गमित करण्याची कार्यवाही करण्यात येईल. अपंग विद्यार्थ्यांकरिता शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनासंदर्भातील अर्ज करण्यापासून योजनेच्या लाभाची रक्कम लाभार्थी विद्यार्थ्यांच्या आधार संलग्नित बँक खात्यात जमा करण्यापर्यंतच्या सर्व प्रक्रिये साठी राज्यस्तरीय DBT पोर्टलचा वापर करणे अनिवार्य राहिल.

(ह) अपंग विद्यार्थ्यांकरीता शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक योजनांकरिता लाभार्थ्यांनी त्यांचा आधार क्रमांक हा ऑनलाईन अर्जामध्ये नमूद करणे आवश्यक असेल. तसेच ज्या बँक खात्यात पात्र लाभार्थ्यांना रक्कम प्राप्त करुन घ्यावयाची आहे, असे बँक खाते आधार क्रमांकाशी संलग्न असल्याची संबधित लाभार्थ्याने खात्री करावी.

(य) उक्त् योजनेअंतर्गत सध्या लाभ घेत असलेले व नवीन लाभार्थी विद्यार्थ्यांना यापुढे राज्यस्तरीय DBT पोर्टलवर नव्याने अर्ज करणे अनिवार्य राहील. या योजनांतर्गत अपंग विद्यार्थ्यांसाठी शिष्यवृत्ती, शिक्षण शुल्क व परिक्षा फी प्रदाने, निर्वाह भत्ता, विद्यावेतने विषयक रक्कम अदा करतेवेळी लाभार्थी विद्यार्थी अभ्यासक्रम व विद्यापीठ/शैक्षणिक संस्था/ महाविद्यालय/ तंत्रनिकेतन निहाय सविस्तर यादी आयुक्त, अपंग कल्याण , पुणे यांना त्वरेने उपलब्ध करुन देण्याची जबाबदारी संचालक, तंत्र शिक्षण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई, संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन संचालनालय, मुंबई, संचालक (शिक्षण) महाराष्ट्र कृषी व शैक्षणिक संशोधन परिषद, पुणे यांची असेल तसेच सदर यादी विभागाच्या / आयुक्तालयाच्या संकेतस्थळावर न चुकता प्रसिध्द करण्याची जबाबदारी आयुक्त, अपंग कल्याण, पुणे यांची राहील.

९. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा सांकेतांक क्रमांक २०१८०८०२१३०३५०३६२२ असा आहे. सदरचे आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

Dnyandev Laxman Sul

Digitally signed by Dnyandev Laxman Sul
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Social Justice Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=a19e16d10b98348341561863c7561e9fc35bb428cdc3ea443c0263495f76285a, serialNumber=0a540933faf44a550ca357b423fa83e6fdce81a4746d167dae68daa29726d41d, cn=Dnyandev Laxman Sul
Date: 2018.08.02 13:07:07 +05'30'

**( ज्ञा.ल.सुळ )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई.
२.मा. मुख्यमंत्राचे प्रधान सचिव, मंत्रालय मुंबई.
३.मा. विरोधी पक्ष नेता, विधानसभा/विधान परिषद , विधानमंडळ, मुंबई.
४.मा. मंत्री सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव.
५.मा. राज्यमंत्री, सामाजिक न्याय यांचे खाजगी सचिव.
६.अपर मुख्य सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
७.प्रधान सचिव, उच्च व तंत्रशिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
८.प्रधान सचिव, कृषी व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई.
९.प्रधान सचिव, माहिती व तंत्रज्ञान विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०.सचिव सामाजिक न्याय व विशेष सहाय्य् विभाग, मंत्रालय, मुंबई.

११. आयुक्त्, अपंग कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
१२. आयुक्त, समाज कल्याण आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य पुणे.
१३. संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे.
१४. संचालक (शिक्षण) महाराष्ट्र कृषी व शैक्षणिक संशोधन परिषद, पुणे.
१५.संचालक, माहिती व तंत्रज्ञान संचालनालय, मुंबई.
१६. संचालक, वैद्यकीय शिक्षण संचालनालय, मुंबई.

## “परिशिष्ट- अ”

| अ.क्र. | योजनांचे नाव | लेखाशिर्ष |
|---|---|---|
| १. | शारिरीक दृष्ट्या अपंग विद्यार्थ्यांना शिष्यवृत्या व उद्योगातील प्रशिक्षण (कार्यक्रम) | २२३५ ०९१९ |
| | | २२३५ १७१९ |
| | | २२३५ २७३३ |